**सन २०१८-१९ मध्ये राज्यातील संभाव्य चारा टंचाईच्या पार्श्वभूमीवर राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत १०० टक्के अनुदानावर वैरण बियाणे व खते वितरण या प्रकल्पासाठी रू.२५.०० कोटी अतिरीक्त निधी मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र. राकृवि-२०१८/प्र.क्र.१५२/पदुम-४,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०४ डिसेंबर, २०१८.

वाचा :- १. कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाचा समक्रमांकाचा शासन निर्णय दि.२३.१०.२०१८

२. केंद्र शासनाने राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत दुष्काळ सदृष्य परिस्थितीवर मात करण्यासाठी राबवावयाच्या अतिरिक्त वैरण विकास कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना.

३. कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाचा शासन निर्णय क्र. एफडीआर- २०१७ /प्र.क्र १६७ / पदुम-४, दि.१५.११.२०१८

४. आयुक्त पशुसंवर्धन महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे कार्यालयीन पत्र क्र.वैवि/ब-९(५)/४५३२-३३/२०१८, पुणे दि. २२.११.२०१८.

**प्रस्तावना :-**

सन २०१८ च्या खरीप हंगामात कमी पर्जन्यमान झाल्यामुळे राज्यात दुष्काळी परिस्थिती उद्भवली आहे. मदत व पूनर्वसन विभागाचा शासन निर्णय दि. ३१.१०.२०१८ अन्वये राज्यातील २६ जिल्हयांमधील १५१ तालुक्यांमध्ये तसेच, शासन निर्णय दि. ०६.११.२०१८ अन्वये, १५१ तालुक्यांव्यतिरिक्त इतर तालुक्यांमधील २६८ महसूली मंडळामध्ये दुष्काळ घोषित करण्यात आलेला आहे. या १५१ तालुक्यांमध्ये व २६८ महसूली मंडळामधील पशुधनास चारा टंचाईची परिस्थिती उद्भवण्याची शक्यता विचारात घेऊन, दुष्काळी परिस्थितीमध्ये राज्यातील पशुधनास आवश्यक हिरवा चारा उपलब्ध व्हावा, तसेच, त्यांची रोगप्रतिकार शक्ती, प्रजनन क्षमता कायम रहाण्यास मदत व्हावी याकरिता,संदर्भीय १ येथील शासन निर्णयान्वये वैरणीचे उत्पादन घेण्यासाठी राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत रू. १०.०० कोटी निधी मंजूर करण्यात आलेला आहे.

राज्यातील जलाशयाखालील / तलावाखालील जमिनीचा विनीयोग फक्त चारा पिके घेण्यास करण्यासाठी वाचा-३ येथील दि.१५.११.२०१८ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. त्यामुळे राज्यात उद्भवणाऱ्या चारा टंचाई परिस्थितीवर मात करण्यासाठी मुबलक प्रमाणात वैरणीचे उत्पादन घेण्यासाठी राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत अतिरिक्त रु. २५.०० कोटी (अक्षरी रु.पंचवीस कोटी मात्र) निधी उपलब्ध करुन देण्याच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

सन २०१८-१९ मध्ये राज्यातील संभाव्य चारा टंचाईच्या पार्श्वभूमीवर राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत १०० टक्के अनुदानावर वैरण बियाणे व खते वितरण या प्रकल्पासाठी अतिरिक्त रु. २५.०० कोटी (अक्षरी रु.पंचवीस कोटी मात्र) निधी मंजूर करण्यास याव्दारे, शासनाची मान्यता तसेच, सदरच्या खर्चास वित्तीय मान्यता देखील प्रदान करण्यात येत आहे.

हा प्रकल्प सन २०१८-१९ मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत उपलब्ध होणाऱ्या निधीच्या अधिन राहून खालील नमुद बाबी विचारात घेऊन राबविण्यात यावा.

१. राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत केंद्र शासनाने दुष्काळी परिस्थितीवर मात करण्याकरीता राबवावयाच्या अतिरिक्त वैरण विकास कार्यक्रमासाठी माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनांमधील अपेंडिक्स - ए मध्ये निश्चित करण्यात आलेल्या चार बाबींपैकी आर्थिक निकषाच्या अनुषंगाने केवळ **वैरण बियाणे व खते** या दोन निविष्ठांसाठीच प्रती १० गुंठे रू.४६०/- (अक्षरी रू. चारशे साठ मात्र) च्या मर्यादेत कमाल दोन हेक्टर क्षेत्रासाठी निवडलेल्या लाभार्थी शेतकऱ्यास रू.९,२००/- (अक्षरी रू.नऊ हजार दोनशे मात्र) च्या मर्यादेत १०० टक्के अनुदानावर वैरण बियाणांचा (उदा. मका, ज्वारी, बाजरी किंवा वैरण समुध्द पिके जसे की, न्युट्रिफिड व तत्सम) व खताचा पुरवठा करण्यात यावा.

२. सदरचा प्रकल्प केंद्र शासनाने राष्ट्रीय कृषि विकास योजनेसंदर्भात अतिरिक्त वैरण विकास कार्यक्रमाच्या अनुषंगाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना विचारात घेवून राबविण्यात यावा.

३. उपलब्ध करून देण्यात येत असलेल्या रू.२५.०० कोटी निधी मधून राज्यातील प्रामुख्याने जलाशयाखालील / तलावाखालील गाळपेर जमिनीवर प्रत्येक जिल्हयात कमीत कमीत २,००० हे. गाळपेर क्षेत्रावर चारा पिकांची लागवड करून वैरण उत्पादन घेण्यासाठी या योजनेअंतर्गत लाभ देण्यात यावा. याशिवाय मागणी असल्यास अन्य पात्र लाभार्थ्यांना देखील चारा पिकांच्या लागवडीकरीता लाभ देण्यात यावा.

४. या प्रकल्पांतर्गत उपलब्ध करून देण्यात आलेल्या निधीचा तात्काळ विनियोग करून, विहीत नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्यात यावे.

५. या प्रकल्पांतर्गत उपलब्ध झालेला निधी व त्याचा विनियोग याबाबतचा हिशोब स्वतंत्रपणे विहीत केलेल्या लेखा पध्दतीनुसार ठेवण्यात यावा.

६. संबंधित जिल्ह्याचे जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त हे या योजनेचे आहरण व संवितरण अधिकारी राहतील.

७. राज्यस्तरावर या प्रकल्पाचे अंमलबजावणी अधिकारी आयुक्त पशुसंवर्धन तर, विभागीय स्तरावर संबंधित विभागाचे प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन हे राहतील.

८. सदर प्रकल्पास आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांनी तात्काळ तांत्रिक मंजूरी प्रदान करावी.

९. या प्रकल्पाच्या यशस्वी अंमलबजावणीसाठी आवश्यक त्या सविस्तर मार्गदर्शक सूचना आयुक्त पशुसंवर्धन यांनी त्यांच्या स्तरावरून सर्व संबंधित अधिकारी यांना तात्काळ निर्गमित कराव्यात.

१०. सदरच्या प्रकल्पास राष्ट्रीय कृषी विकास योजनेअंतर्गतच्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या आगामी बैठकीत कार्योत्तर मान्यता प्रदान करून घेण्यात यावी.

११. सदरचा प्रकल्प राबविल्यानंतर आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांनी प्रकल्पाचा फलश्रुती अहवाल त्यांच्या अभिप्रायासह शासनास सादर करावा.

सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक २०१८१२०४१३०८४५३६०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shri Ravindra Gurav

Digitally signed by Shri Ravindra Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And Adf Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0030b22364370f4d96ab251b7263219586c0069b661c3f9cd6fd67e55000ce92, cn=Shri Ravindra Gurav
Date: 2018.12.04 13:16:17 +05'30'

( रविंद्र गुरव )

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.

२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. सर्व विधानसभा सदस्य / विधानपरिषद सदस्य
६. मा.मुख्य सचिव यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. सचिव, (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमण प्राधीकरण, मुंबई.
१०.आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, औंध, पुणे
११.आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, मध्यवर्ती इमारत, पुणे
१२.विभागीय आयुक्त (सर्व)
१३. जिल्हाधिकारी (सर्व)
१४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१५. उपसचिव (राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / लेखा परिक्षण, मुंबई / नागपूर.
१७. प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन (सर्व)
१८. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
१९.सर्व अधिक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
२०. जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, (सर्व)
२१. जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
२२. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी.
२३. सर्व कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग / मृदसंधारण विभाग.
२४. निवड नस्ती, पदुम-४.